स्मार्ट सिटी अभियानांतर्गत केंद्र हिस्सा व राज्य हिश्याची आर्थिक तरतुद व निधी वितरणाकरीता नवीन लेखाशिर्ष उघडणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. स्मार्टसि-२११७/प्र.क्र.१०/नवि-२३**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- ०६ जुलै, २०१७**

**संदर्भ:- (१) केंद्र शासनाच्या स्मार्ट सिटी अभियानाच्या जून, २०१५ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.**
**(२) शासन निर्णय क्र.स्मार्टसि-२०१५/प्र.क्र.१७६/नवि-३३, दिनांक १४.०८.२०१५**

**प्रस्तावना :-**

स्मार्ट सिटी मिशन या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणी करीता संदर्भ क्र. १ मधील मार्गदर्शक सूचनानुसार संदर्भ क्र. २ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

स्मार्ट सिटी अभियानाच्या अंमलबजावणी अंतर्गत राज्याच्या अर्थसंकल्पात राज्य अभियान संचालक, स्मार्ट सिटी योजना यांच्या स्तरावर योजना राबविण्याकरीता आवश्यक निधीची तरतुद करणे, स्मार्ट शहरांच्या प्रशासकीय व कार्यालयीन खर्च, या प्रयोजनांकरीता आर्थिक तरतुद करणे व केंद्र व राज्य हिश्याचे अनुदानाचे वितरणाकरीता सध्या अस्तित्त्वात असलेल्या लेखाशिर्षाव्यतिरिक्त नवीन लेखाशिर्ष उघडणे प्रस्तावित आहे.

तसेच स्मार्ट शहरांच्या प्रशासकीय व कार्यालयीन खर्चाकरीता केंद्र हिश्याकरीता अस्तित्वातील लेखाशिर्षाऐवजी नवीन लेखाशिर्ष प्रस्तावित आहे.

**शासन निर्णय :-**

स्मार्ट सिटी अभियानांतर्गत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनानुसार खालील तीन लेखाशिर्ष नव्याने उघडण्यास याद्वारे मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

१) **स्मार्ट सिटी अभियानाअंतर्गत एकुण राज्य हिश्याच्या ५% रक्कम संबंधित स्मार्ट शहरांच्या विशेष उद्देश वहन यांना प्रशासकीय व कार्यालयीन खर्चाकरीता उपलब्ध करून देणे.**

| | |
|---|---|
| मागणी क्र. F०२<br>२२१७ - नगर विकास<br>८० - सर्वसाधारण<br>१९१ - महानगरपालिकांना सहाय्य<br>(००) (८९) - स्मार्ट सिटी अभियानाकरीता विशेष उद्देश वहनांसाठी प्रशासकीय व कार्यालयीन खर्चाकरीता एकुण राज्य हिश्याच्या ५% सहाय्य (राज्य हिस्सा ५%)<br>कायमचा संकेतांक २२१७ A१२७ | Demand No. F-02<br>2217 - Urban Development<br>80 - General<br>191 - Assistance to Local Bodies, Corporations, etc.<br>(00) (89) - 5% Assistance of total State share for Administrative & Office Expenses of Special Purpose Vehicle under Smart City Abhiyan (State share 5%)<br>Cross Reference Code 2217 A127 |

२) **स्मार्ट सिटी अभियानाकरीता एकुण राज्य हिश्याच्या २% रक्कम राज्य अभियान संचालक यांच्या स्तरावर उपलब्ध करून देणे.**

| | |
|---|---|
| मागणी क्र. F-०२<br>२२१७ - नगर विकास<br>८० - सर्वसाधारण<br>१९१- महानगरपालिकांना सहाय्य<br>(००) (९०) - स्मार्ट सिटी अभियानाकरीता राज्य अभियान संचालक यांच्या स्तरावर एकुण राज्य हिश्याच्या २% सहाय्य (राज्य हिस्सा २%)<br>कायमचा संकेतांक २२१७ A१३६ | Demand No. F-02<br>2217 - Urban Development<br>80 - General<br>191 - Assistance to Local Bodies, Corporations, etc.<br>(00) (90) - 2% Assistance of total State share at the level of Mission Director State Abhiyan under Smart City Abhiyan (State share 2%)<br>Cross Reference Code 2217 A136 |

३) **स्मार्ट सिटी अभियानाकरीता एकुण केंद्र हिश्याच्या ५% रक्कम विशेष उद्देश वहन यांना प्रशासकीय व कार्यालयीन खर्चाकरीता उपलब्ध करून देणे.**

| | |
|---|---|
| मागणी क्र. F-०२<br>२२१७ - नगर विकास<br>८०- सर्वसाधारण<br>१९१- महानगरपालिकांना सहाय्य<br>(००) (८८) - स्मार्ट सिटी अभियानाअंतर्गत विशेष उद्देश वहनसाठी प्रशासकीय व कार्यालयीन खर्चाकरीता एकुण केंद्र हिश्याच्या ५% सहाय्य (केंद्र हिस्सा ५%)<br>कायमचा संकेतांक २२१७ A११८ | Demand No. F-02<br>2217 - Urban Development<br>80 - General<br>191 -Assistance to Local Bodies, Corporations, etc.<br>(00) (88) - 5% Assistance of total Central share for Administrative & Office Expenses of Special Purpose Vehicle under Smart City Abhiyan (Central share 5%)<br>Cross Reference Code 2217 A118 |

सदर शासन निर्णय वित्त विभाग यांच्या दिनांक ०४.०७.२०१७ रोजीच्या अनौपचारिक संदर्भाद्वारे मिळालेल्या मान्यतेनुसार तसेच महालेखापाल कार्यालय, मुंबई यांच्या दिनांक १६.०६.२०१७ च्या अनौपचारिक संदर्भाद्वारे मिळालेल्या मंजुरीद्वारे निर्गमित करण्यात येत आहे. उपरोक्त लेखाशिर्षाअंतर्गत आर्थिक तरतुद करणे किंवा निधी वितरण करताना वित्त विभागाच्या सर्व प्रचलित अटी व शर्तीच्या आधारे करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०७०६१७५९४५६१२५ असा आहे. हे शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Malhari Kawade

Digitally signed by Ajit Malhari Kawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, serialNumber=49349d578c976e0d05a9793ef412604378bdf9fed13d605caba002427a7c370b, cn=Ajit Malhari Kawade
Date: 2017.07.06 18:00:56 +05'30'

**( अजित म. कवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, (नगर विकास विभाग-१), मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, (नगर विकास-२), मंत्रालय, मुंबई
८. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
९. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपुर
१०. सह सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. आयुक्त, ठाणे/औरंगाबाद/नाशिक/नागपूर/पुणे/सोलापूर/कल्याण-डोंबिवली/ पिंपरी-चिंचवड महानगरपालिका.
१३. जिल्हाधिकारी, ठाणे/औरंगाबाद/नाशिक/नागपूर/पुणे/सोलापूर.
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी - स्मार्ट सिटी, ठाणे/औरंगाबाद/नाशिक/नागपूर/पुणे/सोलापूर /कल्याण-डोंबिवली/पिंपरी-चिंचवड महानगरपालिका
१५. निवड नस्ती, नवि-२३.